**कोल्हापूर येथे नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबत...**

## महाराष्ट्र शासन
### उच्च व तंत्र शिक्षण विभाग
### शासन निर्णय क्र. मान्यता-२०२२/प्र.क्र.२०२/तांशि-४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च, २०२३.

<u>वाचा</u> :- १) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे पत्र क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१०८/आस्था-२, दि.२१.०९.२०२२.

२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/ एनजीसी/ मान्यता/२०२२/१०९८, दि.२२.११.२०२२.

३) राज्य मंत्रिमंडळाच्या दि.१७.०३.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

<u>प्रस्तावना : -</u>

कोल्हापूर जिल्ह्यामध्ये ऑटोमोबाईल, ऑटोमेशन, टेलिकम्युनिकेशन, ऊर्जानिर्मिती इत्यादी क्षेत्रांमध्ये झालेला औद्योगिक विस्तार तसेच सूत गिरणी, साखर कारखाने, कापड गिरण्या, फाऊंड्री, मशिन शॉप इत्यादींचा औद्योगिक विस्तारातील सहभाग लक्षात घेऊन, कोल्हापूर जिल्हयामध्ये नविन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्याची व्यवहार्यता, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयासाठी आवश्यक निकष, त्यासाठी लागणारी संसाधने, उपलब्ध साधनसामग्री इ. बाबी तपासून कोल्हापूर येथील नविन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्याबाबतचा विस्तृत प्रकल्प अहवाल सादर करण्याबाबत दि.११ व १२ सप्टेंबर, २०२२ रोजी मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत संचालक, तंत्र शिक्षण यांना संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२१.०९.२०२२ रोजीच्या पत्रान्वये निर्देश देण्यात आले. त्यास अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भाधीन क्र.०२ येथील दि.२२.११.२०२२ च्या पत्रान्वये कोल्हापूर येथे नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय स्थापन करण्याबाबतचा विस्तृत अहवाल शासनास सादर केला. त्यानुसार कोल्हापूर येथील नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्याचा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.०३ येथील दि.१७.०३.२०२३ च्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयानुसार कोल्हापूर येथे नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय स्थापन करण्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. राज्यात कोल्हापूर येथे शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.
२. कोल्हापूर येथील नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयामध्ये शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून खालील अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अभ्यासक्रमाचे नाव** | **प्रवेश क्षमता** |
|---|---|---|
| १ | आर्टिफिशिअल इंटिलिजन्स ॲन्ड डाटा सायन्स | ६० |
| २ | मेकॅनिकल ॲन्ड ऑटोमेशन इंजिनिअरींग | ६० |
| ३ | कॉम्प्युटर सायन्स ॲन्ड इंजिनिअरींग | ६० |
| ४ | इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअरींग | ६० |
| ५ | इलेक्ट्रिकल इंजिनिअरींग | ६० |
| | **एकूण- प्रवेश क्षमता** | **३००** |

३. कोल्हापूर येथील नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाकरीता आगामी ४ वर्षात विहित कार्यपध्दतीनुसार खालीलप्रमाणे टप्प्याटप्प्याने पदे मंजूर करण्यात येतील :-

| **वर्ष** | **प्राचार्य** | **प्राध्यापक** | **सहयोगी प्राध्यापक** | **सहाय्यक प्राध्यापक** | **शिक्षकेत्तर कर्मचारी** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|
| वर्ष - १ | १ | १ | ३ | १० | १४ | २९ |
| वर्ष - २ | -- | २ | ४ | ११ | १२ | २९ |
| वर्ष - ३ | -- | १ | ४ | ११ | १२ | २८ |
| वर्ष - ४ | - | २ | ४ | ११ | १२ | २९ |
| एकूण | १ | ६ | १५ | ४३ | ५० | ११५ |

४. कोल्हापूर येथील नवीन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयासाठी शासकीय तंत्र निकेतन, कोल्हापूर येथील जमिन उपलब्ध असल्याने बांधकाम व तद्अनुषंगिक खर्च, यंत्र सामुग्री व उपकरणे, संगणक, फर्निचर, वेतनावरील खर्च व इतर पायाभुत सुविधांसाठी आवर्ती व अनावर्ती खर्चानुसार आगामी ४ वर्षात खालीलप्रमाणे अंदाजित खर्चास मान्यता देण्यात येत आहे :-

*(रु.लाखात)*

| **वर्ष** | **अनावर्ती खर्च** | **आवर्ती खर्च** | **एकूण खर्च** |
|---|---|---|---|
| वर्ष - १ | ८८६७ | ३०३.८ | ९१७०.८ |
| वर्ष - २ | ३९२६ | ६८२.९५ | ४६०८.९५ |
| वर्ष - ३ | ३६९५ | ९८४.७ | ४६७९.७ |
| वर्ष - ४ | २४६२ | १२२६.२९ | ३६८८.२९ |
| **एकूण** | **१८९५०** | **३१९७.७४** | **२२१४७.७४** |

५. वरीलप्रमाणे महाविद्यालय सुरु करण्यासाठी आवश्यक असलेला रु.२२१.४८ कोटी खर्चास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार आर्थिक वर्ष २०२३-२४ करीता आवश्यक तेवढ्या निधीची तरतूद, पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यात यावी.

६. या निर्णयाच्या अनुषंगाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांनी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली या शिखर संस्थेची मान्यता घेण्याची कार्यवाही तातडीने करावी.

७. सदरचा शासन निर्णय हा मंत्रीमंडळ बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२७११५११५१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=21524D9E84E57776BA1EE448660F3699BDD08917801A19974A72D568F57F5401, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2023.03.27 18:46:21 +05'30'

**( नि. ज्यो. घिरटकर )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधान सभा, विधानभवन, मुंबई
५. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सहसंचालक, तंत्र शिक्षण, सर्व विभागीय कार्यालये (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
८. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, मुंबई
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११.प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर (संचालक,तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
१३.कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड
१४.कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
१५.सर्व मंत्रालयीन प्रशासनिक विभाग
१६.कार्यासन तांशि-५/तांशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.कार्यासन १४७१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन व्यय-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.निवड नस्ती/तांशि-४.